केंद्र पुरस्कृत राष्ट्रीय अन्नसुरक्षा अभियान अंतर्गत लघु अभियान-१ ( तेलबिया) व लघु अभियान-३ (वृक्षजन्य तेलबिया) या योजनांकरिता सन २०१८-१९ या आर्थिक वर्षाकरिता केंद्र शासनाकडून प्राप्त निधी वितरीत करणेबाबत.

**(लेखाशिर्ष २४०१ A४८६ व २४०१ A५०१)**

**महाराष्ट्र शासन**

आदिवासी विकास विभाग

शासन निर्णय क्रमांकः बीयुडी-२०१८ / प्र.क्र.११ / कार्यासन.६

मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२

दिनांक :- २७ जून, २०१८.

वाचा -

१) वि. वि, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०१८ /प्र.क्र.६९ / अर्थ-३, दि.०२.०४.२०१८.

२) कृषि व पदुम विभागाची नस्ती क्र. रागते-१०१८ / प्र. क्र.७३/ ४-अे.

**शासन निर्णय-**

केंद्र पुरस्कृत राष्ट्रीय तेलबिया व तेलताड अभियानाचा सन २०१८-१९ पासून राष्ट्रीय अन्नसुरक्षा अभियान अंतर्गत लघु अभियान-१ ( तेलबिया) व लघु अभियान-३ (वृक्षजन्य तेलबिया) म्हणून समावेश करण्यात आलेला आहे. यानुषंगाने सन २०१८-१९ साठी **लघु अभियान-१( तेलबिया)** करीता मागणी क्र. टी-५, २४०१ पीक संवर्धन, ७९६- जनजाती क्षेत्र उपयोजना, (०१) (१४) कृषि उन्नती योजना- राष्ट्रीय तेलबिया व तेलताड लघु अभियान-१ तेलबिया (के.पु.यो.)( केंद्र हिस्सा ६० टक्के )(आक्षेउयो ) ( २४०१ A४८६), ३३ अर्थसहाय्य या लेखाशिर्षाखाली रु.४२६.१२ लाख व लघु अभियान-३ (वृक्षजन्य तेलबिया) करीता मागणी क्र. टी-५, २४०१ पीक संवर्धन, ७९६- जनजाती क्षेत्र उपयोजना, (०१) (१६) कृषि उन्नती योजना- राष्ट्रीय तेलबिया व तेलताड लघु अभियान-३ वृक्ष आधारित तेलबिया (के.पु.यो.) (केंद्र हिस्सा ६० टक्के) (आक्षेउयो ) ( २४०१ A५०१), ३३ अर्थसहाय्य या लेखाशिर्षाखाली रु.७.३१ लाख तरतुद करण्यात आलेली आहे.

कृषि व पदुम विभागाच्या वाचा क्र. २ येथील प्रस्तावास अनुसरुन उपरोक्त योजनेकरीता सन २०१८-१९ साठी केंद्र शासनाकडुन प्राप्त झालेला निधी लघु अभियान-१( तेलबिया) करीता ( २४०१ A४८६), ३३ अर्थसहाय्य या लेखाशिर्षाखाली रु.९५.६८ लाख व लघु अभियान-३ (वृक्षजन्य तेलबिया) करीता ( २४०१ A५०१), ३३ अर्थसहाय्य या लेखाशिर्षाखाली रु. ०.८३ लाख असा एकूण ९६.५१ लाख ( अक्षरी रुपये शहान्नव लाख एकावन्न हजार फक्त ) इतका निधी प्रशासकीय विभाग प्रमुख म्हणून अपर मुख्य सचिव (कृषी), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई यांना अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर (BEAMS ) वितरीत करण्यास मंजूरी प्रदान करण्यात येत आहे.

२. सदर निधी अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर वितरीत करण्यात आला आहे. नियंत्रण अधिकारी / विभागप्रमुख यांनी खर्चासंबंधीच्या सध्याच्या शासकीय धोरणास अनुसरुन मंजूर आराखडयानुसार याच वर्षात सदर निधी खर्च होईल याची दक्षता घ्यावी. तसेच उपलब्ध करुन दिलेल्या तरतूदीतून झालेल्या खर्चाचा अहवाल, लेखाशिर्षनिहाय / उपलेखाशिर्षनिहाय तसेच साध्य झालेले भौतिक उद्दिष्टनिहाय माहिती, निधी उपयोगिता प्रमाणपत्र, संबंधित क्षेत्रिय अधिकारी यांनी आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक; संबंधित अपर आयुक्त, आदिवासी विकास; आदिवासी विकास विभाग व कृषि व पदुम विभाग यांना प्रत्येक महिन्याच्या १० तारखेपर्यंत पाठवणेबाबत सूचना देण्यात यावी.

३. नियंत्रण अधिकारी व विभाग प्रमुख यांनी आदिवासी उपयोजना क्षेत्रात, अतिरिक्त आदिवासी उपयोजना क्षेत्रात तसेच आदिवासी उपयोजना क्षेत्राबाहेरील योजनांवर केलेला खर्च स्वतंत्रपणे नोंदविला जाईल याची दक्षता घ्यावी. जेणेकरुन शासनाला आदिवासी क्षेत्रातील व उपयोजने क्षेत्राबाहेरील योजनांवर होणा-या खर्चावर लक्ष ठेवता येईल.

४. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.३१२/ अर्थोपाय, दि.०५.०६.२०१८ अन्वये दिलेल्या सहमतीस अनुलक्षुन निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१८०६२६१६५०३४४१२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Ravindra Digambarrao Aute

Digitally signed by Ravindra Digambarrao Aute
DN: cn=Ravindra Digambarrao Aute, o=Tribal Development Department, ou=Government of Maharashtra, email=rajendra.aute@nic.in, c=IN
Date: 2018.06.27 12:08:55 +05'30'

**रविंद्र दि.औटे**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. अपर मुख्य सचिव ( कृषि ) कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.
२. आयुक्त (कृषि), महाराष्ट्र राज्य,पुणे
३. आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक.
४. अपर आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक / नागपूर / ठाणे / अमरावती.
५. वित्त विभाग ( अर्थसंकल्प- १९ ), मंत्रालय, मुंबई.
६. ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, ५ वा मजला, विधानभवन, मुंबई.
७. महालेखापाल (लेखापरिक्षा)/(लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.
८. कार्यासन क्र. २ व ९, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
९. निवड नस्ती (का.६), आदिवासी विकास विभा, मंत्रालय, मुंबई.